सन २०१५-१६ करिता वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रमांतर्गत सांगली जिल्हयातील शिराळा तालुक्यातील टेकडया हिरव्यागार करणे याबाबतचा चालु बाब प्रस्ताव.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०१५/प्र.क्र.१३१/फ-२
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ०८ मे,२०१५

वाचा :- १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.एफडीएम-२०१४/प्र.क्र.१००/फ-२, दि.९.५.२०१४
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.एफडीएम-२०१४/प्र.क्र.१००/फ-२, दि.५.९.२०१४
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्र.एफडीएम-२०१४/प्र.क्र.९४/फ-२, दि.९.१.२०१५
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थसंकल्प-३, दि.१७.०४.२०१५
५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.१७/१४७/२०१५-१६, दि.६.५.२०१५

प्रस्तावना :-

सन २०१४-१५ करिता वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम (४४०६ ०४९२) अंतर्गत सांगली जिल्हयातील शिराळा तालुक्यातील टेकडया हिरव्यागार करणे या विशेष रोपवन कार्यक्रमांतर्गत ४८ हेक्टर क्षेत्रावर चतुर्थ वर्षाच्या बांधील कामासाठी संदर्भ क्र.१, २ व ३ येथील दि.९.५.२०१४, दि.५.९.२०१४ व दि.९.१.२०१५ च्या शासन निर्णयान्वये रु.७.१३ लक्ष रक्कमेच्या खर्चास मंजूरी प्रदान करण्यात आली होती. सन २०१५-१६ करिता वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रम अंतर्गत (४४०६ ०४९२) एकूण रु.५७००.०० लक्ष इतका नियतव्यय मंजूर असून त्याच्या ७० टक्के प्रमाणात रु.३९९०.०० लक्ष इतका नियतव्यय अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.४ वरील दि.१७.०४.२०१५ च्या परिपत्रकानुसार प्रथम आठ महिन्याकरिता अर्थसंकल्पित निधीच्या ७० % च्या मर्यादेत रक्कम खर्च करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने, अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.५ येथील दि.६.५.२०१५ च्या पत्रान्वये ४८ हेक्टर क्षेत्रावर पंचम वर्षातील बांधील कामांसाठी रु.७.२३ लक्ष रक्कमेचा चालू बाब प्रस्ताव मान्यतेसाठी सादर केलेला आहे.

शासन निर्णय :-

**वित्त** विभागाच्या संदर्भ क्र.४ येथील दि.१७.०४.२०१५ च्या परिपत्रकानुसार प्रस्तावाअंतर्गत रू.७.२३ लक्ष रक्कमेपैकी माहे एप्रिल, २०१५ ते नोव्हेंबर, २०१५ करीता (मासिक निधी विवरण पत्रानुसार) **रू.४.६४ लक्ष (०२-मजूरी-रु.१.३४ लक्ष व २१-सा.पुरवठा-रु.३.३० लक्ष)** इतका निधी वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर निधी यापूर्वी या विभागाकडून मंजूर केलेल्या प्रस्तावातील क्षेत्र/कार्यक्रम/कामे यावरच खर्च होईल व कामाची पुनरूक्ती होणार नाही तसेच कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच सदरहू निधी वितरित करण्यापूर्वी प्रस्तावानुसार योजनेतील निश्चित केलेल्या कामांना सक्षम अधिका-यांची तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी असल्याची व सदरहू कामे यापूर्वी वितरीत केलेल्या

अनुदानातून योग्यरित्या पूर्ण केलेली आहेत व त्यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता झालेली नाही त्याचबरोबर सध्या वाटप करण्यात येणा-या अनुदानातून खर्च करताना यामध्ये कोणतीही वित्तिय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

सदर योजनेवर होणारा खर्च मागणी क्र.सी-१०, प्रधानशिर्ष ४४०६-वनीकरण व वन्यजीवन या वरील भांडवली खर्च, १०१ वनसंरक्षण, विकास व पुनर्निर्मिती, (००)(०६) सामूहिक पातळीवर ठोस वनरोपण कार्यक्रम (४४०६ ०४९२) या लेखा शिर्षाखाली सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या अनुदानातून भागविण्यांत यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या दि.१७.०४.२०१५ च्या परिपत्रकान्वये तसेच वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/१००८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५.०५.२००९ भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१११२३२१४७३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.05.11 12:44:27 +05'30'

**(द.ल.थोरात)**
सह सचिव
महसूल व वन विभाग

सोबत:- मासिक निधी विवरणपत्र

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), कोल्हापूर / विभागीय वन अधिकारी, सांगली
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
५) सह सचिव, वित्त विभाग (अर्थ-३), मंत्रालय, मुंबई-३२.
६) जिल्हा कोषागार अधिकारी कोल्हापूर / सांगली
७) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
८) निवडनस्ती,फ-२ कार्यासन,महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.

## विवरणपत्र - १

शासन निर्णय क्र.एफडीएम-२०१५/प्र.क्र.१३१/फ-२, दि. ०८.०५.२०१५

मासिक निधी विवरणपत्र सन २०१५-१६

**योजनेचे नांव :- राज्य योजनेअंतर्गत सन २०१५-१६ करिता वनीकरणाचा भरगच्च कार्यक्रमांतर्गत शिराळा तालुक्यातील टेकडया हिरव्यागार करणे (४४०६ ०४९२)**

एकूण रु.७.२३ लक्षपैकी रू.४.६४ लक्ष

**(रु.लाखात)**

| सविस्तर शिर्ष | प्रस्तावांतर्गत मागणी केलेली रक्कम | मे, २०१५ | जून २०१५ | जुलै २०१५ | ऑगस्ट, २०१५ | सप्टेंबर, २०१५ | ऑक्टोबर, २०१५ | नोव्हेंबर, २०१५ | एकूण वाटप केलेली रक्कम |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ०२ मजूरी | २.०९ | ०.२७ | ०.१७ | ०.१८ | ०.१९ | ०.२० | ०.१६ | ०.१७ | १.३४ |
| २१ पुरवठा व सामुग्री | ५.१४ | ०.६० | ०.३० | ०.३५ | ०.५० | ०.५० | ०.५५ | ०.५० | ३.३० |
| **एकूण** | **७.२३** | **०.८७** | **०.४७** | **०.५३** | **०.६९** | **०.७०** | **०.७१** | **०.६७** | **४.६४** |

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.05.11 12:44:49 +05'30'

**(द.ल.थोरात)**
सह सचिव
महसूल व वन विभाग